गृह (परिवहन) विभागाच्या राज्य रस्ते सुरक्षा योजनेतुन स्वीय प्रपंजी खाते (PLA A/C ) क्र.०१५१४८०१०४१ अंतर्गत मंजूर असलेल्या अनुदानातून ट्रामा केअर युनिटकरीता यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्यासाठी रु. ५,०६,१४,७६८/-इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२२/प्र.क्र.८०/आरोग्य-८

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १७ मे, २०२२.

वाचा :-

१) सहसंचालक आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र. आसेआ/कक्ष-३/टे-५/रारसुनि/ट्राकेयू/६१३७-१३८/२२, दिनांक ०४.०५.२०२२

२) गृह विभाग शासन निर्णय क्रमांक: एमव्हीआर-०८१७/प्र.क्र.४०१/परि-२ दिनांक ०२.०३.२०२२

प्रस्तावना:-

सहसंचालक आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांनी त्यांच्या दिनांक ०४.०५.२०२२ रोजीच्या प्रस्तावात नमूद केल्यानूसार गृह (परिवहन) विभागाच्या राज्य रस्ते सुरक्षा योजने अंतर्गत सार्वजनिक आरोग्य विभागाच्या ट्रामा केअर युनिट करीता आवश्यक असलेल्या उपकरणांच्या खरेदी साठी राज्य रस्ते सुरक्षा योजने अंतर्गत मंजूर रु. ५,६३,३६,५१७/- (अक्षरी रुपये पाच कोटी त्रेसष्ट लक्ष छत्तीस हजार पाचशे सतरा फक्त) इतक्या अनुदानातून अंदाजित रु.५,०६,१४,७६८/- (अक्षरी रुपये पाच कोटी सहा लक्ष चौदा हजार सातशे अडुसष्ट फक्त) इतक्या रकमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय :-

सहसंचालक आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांनी त्यांच्या दिनांक ०४.०५.२०२२ रोजीच्या प्रस्तावात नमूद केल्यानूसार गृह (परिवहन) विभागाच्या राज्य रस्ते सुरक्षा योजने अंतर्गत सार्वजनिक आरोग्य विभागाच्या ट्रामा केअर युनिट करीता आवश्यक असलेल्या उपकरणांच्या खरेदी

साठी राज्य रस्ते सुरक्षा योजने अंतर्गत मंजूर रु. ५,६३,३६,५१७/- (अक्षरी रुपये पाच कोटी त्रेसष्ट लक्ष छत्तीसहजार पाचशे सतरा फक्त) इतक्या अनुदानातून अंदाजित रु.५,०६,१४,७६८/- (अक्षरी रुपये पाच कोटी सहा लक्ष चौदा हजार सातशे अडुसष्ट फक्त) इतक्या रकमेच्या खरेदीस परिच्छेद क्र.०३ मध्ये नमुद केलेल्या अटींच्या अधिन राहुन प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर खरेदीसाठीचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे.

**विवरण पत्र-१**
**अ-अनुदानाचा तपशिल**

**(रक्कम रुपयांत)**

| अ.क्र. | योजनेचे नाव | आर्थिक तरतुद | मंजुर अनुदान | प्रशासकीय मान्यतेची किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | राज्य रस्ते सुरक्षा गृह (परिवहन)विभाग | परिवहन आयुक्त, मुंबई यांचे स्वीय प्रपंची खाते PLA क्र.०१५१४८०१०४१ कोड नं.२१६७ | ५,६३,३६,५१७/- | ५,०६,१४,७६८/- |
| | **एकूण** | | | **५,०६,१४,७६८** |

**विवरण पत्र-२**
**ब-खरेदीचा तपशिल**

| Sr No | Name of Equipment | Approx .Cost | Quantity | Total Cost |
|---|---|---|---|---|
| 1 | Power bone drill | 9,63,580 | 14 | 1,34,90,120 |
| 2 | C-Arm Machine | 15,00,000 | 7 | 1,05,00,000 |
| 3 | C-Arm Table | 9,73,000 | 21 | 2,04,33,000 |
| 4 | Pneumatic tourniquet | 3,86,978 | 16 | 61,91,648 |
| | **Total** | | | **5,06,14,768** |

**०२.** वरील प्रस्तावाच्या अनुषंगाने सहसंचालक आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांनी सार्वजनिक आरोग्य विभागाकडील ट्रामा केअर युनीट करीता आवश्यक साहित्य सामग्री खरेदी करण्यासाठी राज्य रस्ते सुरक्षा योजनेतुन रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समितीने मंजूर केलेल्या एकूण रु. ५,६३,३६,५१७/- (अक्षरी रुपये पाच कोटी त्रेसष्ट लक्ष छत्तीसहजार पाचशे सतरा फक्त) इतक्या अनुदानातून अंदाजित रु.५,०६,१४,७६८/- (अक्षरी पाच कोटी सहा लक्ष चौदा हजार सातशे अडुसष्ट फक्त) इतक्या रकमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता प्रदान

करण्यासाठी सादर करावयाची प्रमाणपत्रे (परिशिष्ट-अ) सादर केली आहेत. सदर प्रस्तावासाठी आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी त्यांच्या दिनांक २०.०४.२०२२ रोजीच्या टिप्पणीन्वये मान्यता दिली आहे.

**०३.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार खालील अटींच्या अधीन राहून सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदरहू वैद्यकीय उपकरणांची आवश्यकता खातरजमा/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू वैद्यकीय उपकरणांची विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित पध्दतीने खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) वैद्यकीय उपकरणे खरेदी करावयाच्या बाबींची अंदाजित रक्कम रु. ५,०६,१४,७६८/- (अक्षरी रु. पाच कोटी सहा लक्ष चौदा हजार सातशे अडुसष्ट मात्र) इतकी **असून सदरहू खर्च राज्य रस्ते सुरक्षा निधी अंतर्गत भारतीय रिझर्व्ह बँक, मुंबई येथे परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे नावे उघडण्यात आलेले स्वीय प्रपंजी खाते (PLA A/C ) क्र.०१५१४८०१०४१ कोड नंबर २१६७ मधून भागविण्यात यावा. सदरहू निधी हा संक्षिप्त देयकावर आहरीत करून हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ,मुंबई यांचेकडे वर्ग करण्यात यावा.** सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. या बाबींच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

८) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

९) सदर बाबींवरील खर्च सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात मंजुर उपलब्ध असलेल्या व राज्य रास्ते सुरक्षा भारतीय रिझर्व्ह बँक, मुंबई येथे परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे नावे उघडण्यात आलेले स्वीय प्रपंजी खाते (PLA A/C ) क्र.०१५१४८०१०४१ कोड नंबर २१६७ मधून शिल्लक अनुदानातुन प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच करण्यात यावा. सदर निधी संबधित विभागाकडून प्राप्त झाल्यानंतरच खरेदीच्या बाबींचे पुरवठा आदेश देण्यात यावेत.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी -२०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै,२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

**०४.** उपरोक्त परिच्छेद क्र.३ मधील अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी, आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई व संबंधित कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

**०५.** सदर बाबींवरील खर्च गृह विभाग (परिवहन) यांच्या दि.०२.०३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयाच्या अधिन राहुन व राज्य रस्ते सुरक्षा योजने अंतर्गत मंजुर अनुदानातुन तसेच प्रशासकीय मान्येतेच्या मर्यादेतच करण्यात यावा.

**०६.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

**०७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३०१३४७२५४५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT PANDURANG GAIKWAD

Digitally signed by VASANT PANDURANG GAIKWAD
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6762a1c7f462bd961625d44d6971dc2c9f06f3437a7f750c414e77ec2b7f466d, cn=VASANT PANDURANG GAIKWAD
Date: 2022.05.17 16:09:07 +05'30'

**(व.पां.गायकवाड)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि.परेल,मुंबई

३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.

४) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यास्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई

५) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई

६) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई

७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई

८) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर

९) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई

१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई

११) अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक

१२) निवडनस्ती (आरोग्य-८)